**१३ व्या वित्त आयोगाकडून अंगणवाडी बांधकामाकरिता प्राप्त झालेल्या निधीपैकी अखर्चित निधीमधून अभिसरणाद्वारे अंगणवाडी बांधकाम करणे व त्याकरिता निधी वितरण.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- एबावि-२०२१/प्र.क्र.१६१/का.०६**

नवीन प्रशासन भवन, ३रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २१ मार्च, २०२५

**संदर्भ:-** महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०२१/प्र.क्र.१६१/का.०६, दिनांक २०.०३.२०२४ व दि. २८.०३.२०२४

**शासन निर्णय:-**

१३ व्या वित्त आयोगाकडून अंगणवाडी बांधकामाकरिता प्राप्त झालेल्या निधीपैकी अखर्चित निधी उपयोजनात आणण्याच्या अनुषंगाने जिल्हानिहाय एकूण ९३५ उद्दिष्ट निश्चित करण्यास व त्याकरिता प्रति अंगणवाडी बांधकाम रुपये ४.५० लक्ष प्रमाणे एकूण रुपये ४२.०७५० कोटी एवढी रक्कम अनुज्ञेय करण्यास संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक २०.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने अंगणवाडी बांधकामाचा विद्यमान दर व १३ व्या वित्त आयोगामधून रु. ४.५० लक्ष प्रमाणे उपलब्ध केलेला निधी यामधील फ़रकाची रक्कम अंगणवाडी बांधकामाच्या इतर योजनांमधून प्राप्त करून घेऊन कार्यवाही करण्याच्या सूचना देखील सदर शासन निर्णयांन्वये देण्यात आल्या आहेत. तसेच सदर प्रयोजनाकरिता रुपये १८.५० कोटी एवढी तरतूद सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आली होती.

२. तदनंतर संदर्भाधीन क्र. २ येथील दिनांक २८.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये आणखी रुपये १८.५० कोटी तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार १३ व्या वित्त आयोगाच्या निधीमधून प्रति अंगणवाडी रु. ४.५० लक्ष प्रमाणे आतापर्यंत एकूण रुपये ३७ कोटी एवढा निधी सदर प्रयोजनासाठी वितरीत करण्यात आला आहे.

३. सबब, १३ व्या वित्त आयोगामधून अंगणवाडी बांधकामाकरिता प्रति अंगणवाडी रुपये ४.५० लक्ष प्रमाणे निश्चित केलेल्या ९३५ उद्दिष्टांकरिता अनुज्ञेय केलेल्या रुपये ४२.०७५० कोटीच्या मर्यादेत यापूर्वी वितरीत केलेल्या रुपये ३७ कोटी निधी व्यतिरीक्त आणखी रुपये ४.९८५० कोटी निधी सोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केल्याप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार संबंधित जिल्ह्यांनी अंगणवाडी बांधकामाचा विद्यमान दर व १३ व्या वित्त आयोगामधून रु. ४.५० लक्ष प्रमाणे उपलब्ध केलेला निधी यामधील फ़रकाची रक्कम अंगणवाडी बांधकामाच्या इतर योजनांमधून प्राप्त करून घेऊन अंगणवाडी बांधकाम पूर्ण करण्याची कार्यवाही करावी.

४. प्रस्तुत प्रकरणी संदर्भाधीन दिनांक २०.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या सबंधित अटी व शर्ती लागू राहतील. त्यानुषंगाने आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी क्षेत्रीय अधिका-यांना मार्गदर्शक सूचना देऊन याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी.

५. सदर प्रयोजनासाठी मागणी क्र. एक्स-३, ४२३६ पोषण आहार यावरील भांडवली खर्च, ८०- सर्वसाधारण, ८०० -इतर खर्च, (००), (००) (०१)- १३ व्या वित्त आयोगाच्या शिफ़ारशीनुसार अंगणवाडी केंद्रांचे बांधकाम (कार्यक्रम) ४२३६ ००११, ५३- मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ करिता उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून रुपये ४.९८५० कोटी (अक्षरी रुपये चार कोटी अठ्ठ्यान्नव लाख पन्नास हजार फ़क्त) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

६. सदर शासन वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८२/व्यय-६, दिनांक १८.०३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२११६२०५७११३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2025.03.21 17:10:31 +05'30'

**(वि.रा.ठाकूर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महिला व बाल विकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ / २ , मुंबई /नागपूर,
७. सर्व संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
८. सर्व संबंधित जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद,
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१०. संबधित जिल्हा कोषागार अधिकारी,
११. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१२. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. निवड नस्ती (का.६).

महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एबावि-२०२१/प्र.क्र.१६१/का.६,
दिनांक २१ मार्च,२०२५ सोबतचे परिशिष्ट

१३ व्या वित्त आयोगाकडून अंगणवाडी बांधकामाकरिता प्राप्त झालेल्या निधीपैकी अखर्चित निधीमधून अभिसरणाद्वारे अंगणवाडी बांधकाम करणे व त्याकरिता निधी वितरण.

(रुपये लाखात)

| अं.क्र. | जिल्हा | निश्चित करण्यात येत असलेली उद्दिष्टे | रु. ४.५० लक्ष प्रति अंगणवाडी बांधकाम प्रमाणे अनुज्ञेय निधी | शासन निर्णय दि.२०.०३.२०२४ व दि. २८.०३.२०२४ अन्वये वितरीत केलेला निधी | या आदेशान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| **१.** | **२** | **३.** | **४.** | **५.** | **६.** |
| १. | अकोला | १४ | ६३.०० | ५५.४४ | ७.५६ |
| २. | बीड | ४९४ | २२२३.०० | १९१३.३२ | ३००.६८ |
| ३. | भंडारा | १४ | ६३.०० | ५५.४४ | ७.५६ |
| ४. | बुलढाणा | ३१ | १३९.५० | १२२.७६ | १६.७४ |
| ५. | गडचिरोली | ९३ | ४१८.५० | ४०४.२८ | १४.२२ |
| ६. | गोंदिया | २९ | १३०.५० | ११४.८४ | १५.६६ |
| ७. | लातूर | २० | ९०.०० | ७९.२० | १०.८० |
| ८. | नागपूर | २८ | १२६.०० | ११०.८८ | १५.१२ |
| ९. | नाशिक | १४९ | ६७०.५० | ५९०.०४ | ८०.४६ |
| १०. | नांदेड | ३२ | १४४.०० | १२६.७२ | १७.२८ |
| ११. | परभणी | २३ | १०३.५० | ९१.०८ | १२.४२ |
| १२. | रायगड | ३ | १३.५० | १३.५० | ०.०० |
| १३. | वाशिम | ५ | २२.५० | २२.५० | ०.०० |
| | **एकूण** | **९३५** | **४२०७.५०** | **३७००.००** | **४९८.५०** |